भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील गट-क/ गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांना आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

## शासन आदेश क्रमांकः आपना-२०१६/प्र.क्र.२८५/पापु-१५

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय इमारत, मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०२ मार्च, २०१७.

वाचा :-

१) **शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः** एसआरव्ही-१०७६-X, दिनांक १६ मार्च, १९७६

## शासन आदेश :-

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील गट-क आणि गट-ड संवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नतीची संधी उपलब्ध नसल्याने, त्यांना सेवांतर्गत सुधारित आश्वासित प्रगती योजनेचा लाभ मंजूर करण्यासाठी/ अभिप्राय देण्यासाठी संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकातील तरतुदींनुसार उपसचिव (पापु-१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली खालील प्रमाणे समिती स्थापन करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | कार्यालय | समितीमधील पद |
|---|---|---|---|
| १ | उपसचिव (पापु-१५) | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | **अध्यक्ष** |
| २ | सह संचालक (प्रशासन) | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | सदस्य |
| ३ | उप संचालक | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (विचारक्षेत्रातील कर्मचारी कार्यरत असणारा प्रादेशिक विभाग) | सदस्य |
| ४ | प्रशासन अधिकारी | भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे. | सदस्य |
| ५ | अवर सचिव | पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य सचिव |

उक्त सदस्यांमध्ये मागासवर्गीय कर्मचाऱ्यांचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अधिकाऱ्याचा समावेश नसल्यास अवर सचिव पेक्षा कमी दर्जाचा नसेल अशा मागासवर्गीय कर्मचाऱ्याचे प्रतिनिधित्व करणाऱ्या अधिकाऱ्याची नेमणूक समितीचे अध्यक्ष करू शकतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201703021228428428 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.02 12:43:50 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना कळविण्यात येते सदर आदेश यंत्रणेत व यंत्रणेच्या अधिनस्त कार्यालयात कार्यरत असणाऱ्या सर्व गट-क व गट-ड कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
३. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)
५. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व)
६. उपअभियंता (यांत्रिकी), (सर्व)
७. निवडनस्ती (कार्यासन पापु-१५)